१०

**प्रशासकीय मान्यता -**

नरखेड, जि.नागपूर येथे दिवाणी न्यायाधीश (क.स्त.)
आणि न्यायदंडाधिकारी (प्रथम वर्ग) यांच्याकरिता
दोन निवासस्थाने बांधण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

विधि व न्याय विभाग,

शासन निर्णय क्र.सीआरक्यू २३०९/८७७/(प्र.क्र.१५९)-का.१३

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- २ जुलै, २०१०

पहा :- १) प्रबंधक (निरीक्षण-II) ,उच्च न्यायालय (अपिल शाखा),मुंबई यांचे पत्र क्र. बी (डब्ल्यू) ६०४८/१९८९, दि.१२/११/२००९.

२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नागपूर यांचे पत्र क्र. बी-४(२३)/१६८५/१९८९, दि.०९.१०.२००९.

शासन निर्णय :नरखेड, जि.नागपूर येथे दिवाणी न्यायाधीश (क.स्त.)आणि न्यायदंडाधिकारी (प्रथम वर्ग) यांच्याकरिता दोन निवासस्थाने बांधण्याच्या रु.३९,०४,६६८/- (रुपये एकोणचाळीस लक्ष चार हजार सहाशे अडुसष्ठ फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारी नुसार) याद्वारे शासन प्रशासकीय मान्यता देत आहे.

रुपये

| अनुक्रमांक | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | इमारत बांधकाम खर्च | २९,१८,४३० |
| २ | आकस्मिक खर्च (४%) | १,१६,७३७ |
| ३ | विद्युतीकरण (११%) | ३,२१,०२७ |
| ४ | बाहय पाणीपुरवठा आणि मलनिस्सारण (८%) | २,३३,४७४ |
| ५ | अंतर्गत रस्ते | १,२०,००० |
| ६ | भू विकास | २५,००० |
| ७ | स्ट्रीट लाईट | २०,००० |
| ८ | आवार भिंत | १,००,००० |
| ९ | रेन वाटर हार्वेस्टिंग आणि सोलर वाटर हिटींग | ५०,००० |
| | एकुण - | ३९,०४,६६८ |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे

अ) काम सुरु करण्यापूर्वी जमिनीच्या मालकीहक्का बाबतची खातरजमा करण्यात यावी.

ब) मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मंजूर करुन घेंवूनच काम सुरु करावे

क) अंतर्गत रस्ते व संरक्षक भिंत इत्यादी बाबतची मापे छेद नकाशासह विस्तृत अंदाजपत्रकात समाविष्ट करुनच काम सुरु करावे.

या प्रित्यर्थ होणारा खर्च " मागणी क्र.एच ७, ४२१६-गृहनिर्माणावरील भांडवली खर्च-०१ शासकीय निवासी इमारती-( पंचवार्षिक योजनांतर्गत योजना )-७०० इतर गृहनिर्माण (एक) न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा. मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यांत येऊ नये.

३.	हे आदेश, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांकः-३६६/इमा-२, दि.०४/०१/२०१० अनुसार त्या विभागांच्या सहमतीने आणि शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः-विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे २००९ सोबतच्या परिशिष्टातील भाग पहिला उपविभाग-पाच, अनुक्रमांक १ तसेच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(र.ग. पांचाळ)**
**कार्यासन अधिकारी.**

**प्रति,**
महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नागपूर,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा) ,-दोन, महाराष्ट्र, नागपूर,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. २,नागपूर
(नकाशे व अंदाजखर्चपत्रकासह).
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, नरखेड, जि. नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
उपकोषागार अधिकारी, नरखेड, जि. नागपूर,
नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग ( व्यय-६), मंत्रालय, मुंबई,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव, विदर्भ वैधानिक विकास मंडळ,बी -२३/१, साउथ अंबाझरी रोड, अंध विद्यालयाजवळ, नागपूर.
निवड नस्ती.